**पथकर स्थानकावर मा. लोकप्रतिनिधींना सौजन्याची वागणूक देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- खाक्षेस-२०१५/प्र.क्र. ३६/रस्ते-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २५ मार्च, २०१५

**परिपत्रक**

शासनाच्या खाजगीकरणांतर्गत राबविलेल्या रस्ते प्रकल्पांवर राज्यात विविध ठिकाणी पथकर स्थानकांवर पथकर वसूली सुरु आहे. शासनाच्या पथकर धोरणानुसार लोकसभा व राज्यसभेचे विद्यमान व माजी सदस्य तसेच महाराष्ट्र विधानसभा व महाराष्ट्र विधानपरिषदेचे विद्यमान व माजी सदस्य प्रवास करीत असलेली वाहने यांना पथकरातून सुट देण्याबाबतची तरतुद आहे.

पथकर स्थानकावर माननीय लोकप्रतिनिधींना सौजन्याची वागणूक मिळत नसल्याबाबत लोकप्रतिनिधींकडून तक्रारी प्राप्त होत असतात. सदर तक्रारींची दखल पथकर स्थानकावर घेतली जात नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. याबाबत शासनातर्फे सुचित करण्यात येते की, पथकर स्थानकावरील कर्मचा-यांनी मा. लोकप्रतिनिधींना सौजन्यपुर्वक वागणूक द्यावी. याकरीता संबंधित कार्यकारी अभियंता यांनी संबंधीत पथकर कंत्राटदार व पथकर स्थानकांवरील कर्मचारी यांचेसोबत एक बैठक त्वरीत आयोजीत करावी.

माननीय लोकप्रतिनिधीं ज्या वाहनातून प्रवास करीत आहेत ते वाहन त्यांच्या स्वत:च्या मालकीचे नसले तरी ज्या वाहनाचा वापर लोकप्रतिनिधी करीत असतील त्या वाहनातील माननीय लोकप्रतिनिधींनी ओळखपत्र दाखविल्यानंतर सदर वाहनास त्वरीत जाऊ देणेबाबत पथकर स्थानकांवरील कर्मचारी यांना स्पष्ट सुचना देण्यात याव्यात व याची अमंलबजावणी काटेकोरपणे होईल याबाबत दक्षता बाळगावी.

पथकर स्थानकांवरील कर्मच्या-यांकरीता उद्योजकाने खालील बाबींची पुर्तता करत असल्याबाबत खात्री करावी.

१. सदर कर्मचारी/कामगार याचे वय १८ वर्षांपेक्षा कमी नसावे व किमान दहावी उत्तीर्ण असावी.
२. उद्योजकाने सदर कर्मचा-यास ओळखपत्र द्यावे.
३. पथकर स्थानकावर काम करणारे कर्मचारी/कामगार यांच्या चारित्र्याचे प्रमाणपत्र संबंधित पोलीस ठाण्याकडून प्राप्त करुन ते पथकर स्थानकावर ठेवावे. असे प्रमाणपत्र असल्याशिवाय पथकर कंत्राटदार उपभोक्ता शुल्क गोळा करण्यास परवानगी देण्यात येऊ नये.
४. कामावर असताना कर्मचारी जांभळ्या रंगाचा गणवेष धारण करतील. तसेच त्यांनी नारिंगी रंगाचे परावर्तक जाकिट घातलेल्या गणवेषावर उद्योजक कंपनीचे नाव असावे व त्याचा नमूना संबंधित अधीक्षक अभियंत्यांनी मंजूर केलेला असावा.
५. रस्त्याचा वापर करणा-यांना कर्मचा-यांकडून नेहमी सौहार्दपूर्ण वागणूक दिली जावी.
६. कामावर असणा-या कर्मचा-यांची यादी पथकर स्थानकावर लावण्यात यावी.
७. उद्योजकाने / कंत्राटदारने पथकर स्थानकावरील कर्मचा-यांस वेळोवेळी योग्य ते प्रशिक्षण

देण्याची व्यवस्था करावी.

८. प्रशिक्षण देताना पथकरातून सुट असलेल्या वाहनातून प्रवास करणा-या अभ्यागतांना / लोकप्रतिनिधींना सौजन्यपूर्ण वागणूक देण्याबाबतच्या मुद्याचा समावेश करावा. तसेच याबाबत तक्रार आल्यास त्याची तातडीने गंभीर दखल घेण्यात यावी.

९. वरील सुचनांचे पालन न करणा-या दोषी कर्मचा-यांविरुध्द त्वरित कार्यवाही करावी.

सदर सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२७१६१८५९९५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Natthuji Dekate

Digitally signed by Mahesh Natthuji Dekate
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahesh Natthuji Dekate
Date: 2015.03.27 16:33:39 +05'30'

**(म.न.डेकाटे)**

उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक.
२) मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक.
३) मा. लोकप्रतिनीधी (सर्व विधानसभा व विधानपरिषद सदस्य)
४) अप्पर मुख्य सचिव, (सा. बां.) यांचे स्वीय सहाय्यक.
५) मा. प्रधान सचिव, विधानमंडळ यांचे स्वीय सहाय्यक.
६) मा. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक.
७) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
८) मुख्य अभियंता, सा.बां. प्रा.विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर.
९) मुख्य अभियंता(विशेष प्रकल्प), सा.बां.विभाग, मुंबई.
१०) मुख्य अभियंता(राष्ट्रीय महामार्ग), सा.बां.विभाग, कोकणभवन, नवी मुंबई.
११) मुख्य अभियंता व सह सचिव, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) सर्व अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ,/सर्व कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग,
१३) उप सचिव (खा.र.१, खा.र.२, रा.म.), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.